राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांतर्गत राज्यातील २१० अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अंनिका-२०२५/प्र.क्र.४४/आरोग्य -५**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, १० वा मजला
मंत्रालय, मुंबई-४०० ००१
दिनांक: २४ मार्च, २०२५.

वाचा :-

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शा.नि.क्र.:पदआ-२००७/प्र.क्र.११७/सेवा-१, दि.०६.०८.२००७.
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शा.नि.क्र.:अंनिका-२०१८/प्र.क्र.२६३/आ-५, दि.१०.१०.२०२४.
३) वित्त विभाग , शा.नि.क्र.:पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि.०३.०३.२०२५
४) सह संचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग), मुंबई यांचे पत्र क्र. जा.क्र.आसेआ/आस्था/कक्ष८अ/२१० अस्थायी पदे/१२१९/२५, दि.१७.०३.२०२५.

प्रस्तावना :-

राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांतर्गत संदर्भ क्र.१ येथे नमुद शासन निर्णयान्वये सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखालील आरोग्य सेवा संचालनालय (मुख्यालय, मुंबई, कार्यक्रम प्रमुख निहाय तसेच क्षेत्रीय कार्यालये) निहाय पदांचा सुधारित आकृतीबंध निश्चित करण्यात आलेला आहे. राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांतर्गत २१० अस्थायी पदे वरील संदर्भ क्र.२ येथील १० ऑक्टोबर, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजुरी देण्यात आली होती. सहसंचालक, आरोग्य सेवा, (असंसर्गजन्य रोग), मुंबई यांच्या संदर्भ क्र.४ येथील प्रस्तावानुसार सदर २१० अस्थायी पदांचे कामकाजाचे स्वरुप, गरज व महत्व लक्षात घेता, या अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते ३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांतर्गत खाली नमूद केलेली २१० अस्थायी कार्यरत पदे राज्यातील जनतेला आरोग्य विषयक सेवा सातत्याने उपलब्ध करुन देत असल्याने या अस्थायी

पदांना दि.०१.०३.२०२५ ते ३१.०८.२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास याद्वारे शासन मंजुरी देण्यात येत आहे. सदर कालावधीत सुधारीत आकृतीबंध मंजूर करुन घेण्याच्या अटीच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदांचे नाव | अस्थायी पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | नेत्रशल्य चिकित्सक वर्ग-१ | ६ |
| २ | नेत्रशल्य चिकित्सक वर्ग-२ | १५ |
| ३ | नेत्रचिकित्सा अधिकारी वर्ग-३ | १३८ |
| ४ | ओ.टी. नर्स वर्ग-३ | २४ |
| ५ | वाहनचालक वर्ग-३ | ७ |
| ६ | नर्सिंग ऑर्डली वर्ग-४ | ८ |
| ७ | शस्त्रक्रिया गृह सहाय्यक वर्ग-३ | ४ |
| ८ | कक्ष सेवक-४ | ८ |
| **एकूण** | | **२१०** |

२. या शासन निर्णयाद्वारे मुदतवाढ दिलेल्या अस्थायी पदांवरील खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षातून सन २०२५-२६ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक: आर-१**
२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१-नागरी आरोग्य सेवा विषम चिकित्सा
११० रुग्णालये व दवाखाने
११० (२) मुफसल रुग्णालये व दवाखाने
(०१) (०१) मुफसल क्षेत्रातील अध्यापनेत्तर शासकीय रुग्णालये व दवाखाने
(अंधत्व नियंत्रण) (२२१००१४६)

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.०३.०३.२०२५ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. तसेच, उपरोक्त अस्थायी पदांना मुदतवाढ दिलेल्या कालावधीत वित्त विभागाच्या दि.०३.०३.२०२५ रोजीच्या शासन निर्णयातील निर्देशानुसार आवश्यक कार्यवाही करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्रमांक २०२५०३२४११३४५४६४१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHESH
GURULING
HANSHETTI

Digitally signed by MAHESH GURULING HANSHETTI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=5d541c6ddf0221a38b5bf17bde071c16e4fc5d5
9c6c056a12206b90f86b0b039, postalCode=400032,
st=Maharashtra,
serialNumber=B2EDCC53DBB4AA0ABD5E56CEB34FAF6
20B051435FE8057488BAB1D4B20721FD1, cn=MAHESH
GURULING HANSHETTI
Date: 2025.03.21 21:25:13 +05'30'

**(महेश हंशेट्टी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
३. संचालक, आरोग्य सेवा, आयुक्तालय, मुंबई/पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (नेत्र), मुंबई.
५. सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व मंडळे)
७. जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)
८. जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
९. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११.निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१२.वित्त विभाग, व्यय-१३, वि.सु.-१, सेवा-३, अर्थसंकल्प-९, मंत्रालय, मुंबई.
१३.सार्वजनिक आरोग्य विभाग, अर्थसंकल्प शाखा, सेवा-१, सेवा-५, मंत्रालय, मुंबई.
१४.निवडनस्ती (आरोग्य-५).